**महाराष्ट्र शासन**
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक - शेअवि-२०१४/प्र.क्र.६९/११-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
**दिनांक - २७ ऑक्टोबर, २०१४**

**वाचा:-** १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दि.१९ऑगस्ट, २००४
२) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्र.एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे,दि.५जानेवारी, २००५
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००९/प्र.क्र.२६८/११-अे, दि.४ डिसेंबर, २००९
४) शासन शुद्धीपत्र, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००९/प्र.क्र.२६८/११-अे, दि.५ मार्च, २०११
५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२०१३/प्र.क्र.११८/११-अे, दि. ३१ऑक्टोबर , २०१३
६) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.शेअवि-२०१४/प्र.क्र.३४/सां.९/२४७/२०१४,दि.३० ऑगस्ट,२०१४
७) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.शेअवि-२०१४/प्र.क्र.५/का.सां.९/३०१/२०१४,दि.२२ ऑक्टोबर,२०१४

**प्रस्तावना :-**

शेती व्यवसाय करताना होणारे अपघात, वीज पडणे, पूर, सर्पदंश, विंचूदंश, विजेचा शॉक बसणे इ. नैसर्गिक आपत्तीमुळे होणारे अपघात, रस्त्यावरील अपघात, वाहन अपघात तसेच अन्य कोणत्याही कारणांमुळे होणारे अपघात यामुळे बऱ्याच शेतकऱ्यांचा मृत्यू ओढवतो किंवा काहींना अपंगत्व येते. घरातील कर्त्या व्यक्तिस झालेल्या अपघातामुळे कुटुंबाचे उत्पन्नाचे साधन बंद होवून अडचणीची परिस्थिती निर्माण होते. अशा अपघातग्रस्त शेतकऱ्यांस/त्यांच्या कुटुंबास आर्थिक लाभ देण्याकरिता कोणतीही स्वतंत्र विमा योजना नसल्यामुळे शासनाने संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना कार्यान्वित केलेली आहे. सन २००९-१० पासून सदर योजनेचे नाव बदलून त्याऐवजी **शेतकरी जनता अपघात विमा योजना** असे नामाभिधान करण्यात आले आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यात शेतकरी जनता अपघात विमा योजना सन २०१४-१५ मध्ये राबविताना योजनेकरीता विमा सल्लागार कंपन्यांच्या नियुक्ती संदर्भातील बाब शासनाच्या विचाराधीन होती. आयुक्त (कृषि) यांनी त्यांचे स्तरावर निविदा मागवून आणि छाननी करुन त्यांच्या दि.३०/८/२०१४ आणि दि.२२/१०/२०१४ च्या पत्रानी सादर केलेल्या प्रस्तावांवर साकल्याने विचार करुन शासनाने सन २०१४-१५ या वर्षाकरीता खालीलप्रमाणे विमा सल्लागार कंपन्यांची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या विभागात नियुक्ती करण्याचा निर्णय घेतला आहे :-

| अ.क्र. | विमा सल्लागार कंपनीचे नाव | वाटप करण्यात आलेला विभाग |
|---|---|---|
| १ | लाईफ ॲण्ड जनरल इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि., पुणे | अमरावती |
| २ | जायका इन्शुरन्स ब्रोकरेज प्रा.लि., नागपूर | कोकण |
| ३ | युनिव्हर्सल इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि. मुंबई | पुणे |
| ४ | कबाल इन्शुरन्स ब्रोकींग सर्व्हिसेस प्रा.लि., मुंबई | नागपूर |
| ५ | डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स प्रा. लि. पुणे | नाशिक |
| ६ | अलमंड्स इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि., मुंबई | औरंगाबाद |

२. विमा हप्ता दर निश्चित करणे व विमा कंपन्यांची नियुक्ती करण्यासंदर्भात गठित करण्यात आलेल्या उच्चस्तरीय समितीच्या निर्णयानुसार नियुक्त करण्यात येणाऱ्या विमा कंपन्यांसमवेत विमा सल्लागार कंपन्यांनी काम करावयाचे असून विमा सल्लागार कंपन्यांना देण्यात यावयाच्या ब्रोकरेजची रक्कम विमा सल्लागार

कंपन्यांना विमा कंपन्यांकडून अदा करण्यात येईल. विमा कंपन्यांच्या नियुक्ती संदर्भातील आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. विमा सल्लागार कंपनीने त्यांच्याकडे प्राप्त होणारे प्रस्ताव व्यवस्थितरीत्या / पूर्णतः तपासावेत व परिपूर्ण प्रस्ताव संबंधित विमा कंपनीकडे मान्यतेसाठी सादर करावेत. विमा सल्लागार कंपनीने विमा कंपनीकडे पाठविलेले प्रस्ताव मंजूर करुन घेण्याची संपूर्ण जबाबदारी विमा सल्लागार कंपनीची राहील. विमा दावा विमा कंपनीकडे सादर झाल्यापासून त्यावर ६० दिवसांच्या आत कार्यवाही करणे विमा कंपनीवर बंधनकारक राहील. मात्र तरीही विमा कंपनीने प्रस्ताव नाकारल्यास, आवश्यक कागदपत्रांची पूर्तता झालेल्या प्रकरणी संबंधितांनी विमा सल्लागार कंपनीशी संपर्क साधल्यास, विमा सल्लागार कंपनीने शेतकऱ्यांच्यावतीने इर्डा ग्राहक तक्रार कक्ष / विमा न्यायाधीश / जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच / राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग /न्यायालय येथे दावे दाखल करणे आवश्यक राहील. अशा प्रकरणी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती शासनाकडून अथवा शेतकऱ्यांकडून/ दावेदारांकडून करण्यात येणार नाही.

४. विमा सल्लागार कंपन्यांनी जिल्ह्यातील प्रलंबित प्रकरणांची यादी व मासिक प्रगती अहवाल आयुक्त (कृषि) / विभागीय कृषि सहसंचालक / संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / तालुका कृषि अधिकारी यांचेकडे दरमहा पाठवावा. अपुऱ्या कागदपत्रांमुळे प्रलंबित राहिलेल्या / नाकारलेल्या प्रस्तावांप्रकरणी कागदपत्रांची पूर्तता करण्याची जबाबदारी विभागीय कृषि सहसंचालक / जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / तालुका कृषि अधिकारी यांची राहील. त्यांनी त्यांची जबाबदारी व्यवस्थितरित्या पार पाडली नाही तर त्यांना वैयक्तिकरित्या जबाबदार धरण्यात येईल.

५. सन २०१४-१५ मध्ये शेतकरी जनता अपघात विमा योजनेसंबंधी शासनाचे वतीने आयुक्त (कृषि) तसेच विमा सल्लागार कंपन्या व विमा कंपन्या यांचेमध्ये योजनेच्या अटी/शर्ती व मान्यतेनुसार सामंजस्य करार (MOU) व त्रिपक्षीय करार (Tripartite Agreement) करुन त्यानुसार योजना अंमलात आणली जाईल. शासन व विमा कंपन्यांमध्ये झालेल्या पॉलिसी करारातील तरतूदी, उपरोक्त दि.४ डिसेंबर,२००९ च्या शासन निर्णयाद्वारे व उपरोक्त दि.५ मार्च,२०११ च्या शासन शुध्दीपत्रान्वये विहित केलेल्या अटी व शर्ती तसेच भविष्यात लागू करण्यात येणाऱ्या अटी व शर्ती तसेच मार्गदर्शक सुचनांनुसार विमा दावे मंजूर करणे तसेच विमा प्रस्तावांसंदर्भातील कार्यपध्दती, सादर करावयाच्या आवश्यक कागदपत्रांबाबतचा तपशिल व नमुने इ. बाबी विमा कंपन्यांवर बंधनकारक राहतील.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(श.बा.पावसकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
२) अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
८) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३) अध्यक्ष, कबाल इन्शुरन्स ब्रोकींग सर्व्हिसेस प्रा. लि., मित्तल टॉवर्स, ११८-बी बिंग, ११ वा मजला, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१

१४) युनिव्हर्सल इन्शुरन्स ब्रोकर्स सर्व्हिसेस प्रा.लि., २२६, कॅनडा बिल्डींग, तिसरा मजला, डॉ.डी. एन.रोड, फोर्ट,मुंबई-४०० ००१

१५) अलमंडस इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि.मुंबई, लेव्हल ५, ग्रँडे पॅलाडियम, १७५, सीएसटी रोड, कलिना, सांताक्रूज (पू), मुंबई ९८

१६) जायका इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि.नागपूर, दुसरा मजला, जायका बिल्डींग, कमर्शियल रोड, सिव्हिल लाईन्स, नागपूर ४४० ००१

१७) डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि., २०१, मॉट वर्ट झेनिथ, बाणेर रोड, पुणे ४११ ०४५

१८) लाईफ ॲण्ड जनरल इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि., ३९२/अे, महाले प्लॉट, गोखलेनगर रोड, पुणे-४११ ०१६

१९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती ) प्रसिध्दीच्या विनंतीसह

२०) ग्रंथालय प्रमुख, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती)

२१) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१

२२) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

२३) सर्व जिल्हाधिकारी

२४) सर्व तहसिलदार

२५) सर्व कृषि संचालक

२६) सर्व विभागीय कृषि सह संचालक

२७) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

२८) सर्व तालुका कृषि अधिकारी

२९) सर्व उपसचिव /अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३०) सर्व मंत्रालयीन विभाग

३१) निवड नस्ती, कार्यासन ११-अे